नक्षलवादी कारवाईसह अतिरेकी कारवाई, दरोडेखोरी, संघटीत गुन्हेगारी विरोधी कारवाई व आपात्कालीन काळात मदत करताना मृत व जखमी झालेल्या पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटुंबियांना नुकसान भरपाई व इतर सोयी सुविधा देण्याबाबत.

दिवंगत अधिकारी/कर्मचारी यांच्या विधवा पत्नीस पुनर्विवाह केल्यानंतरही कुटूंबनिवृत्तीवेतनाचा लाभ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - पोनुभ-०२२३/प्र.क्र.४४/पोल-७.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

दिनांक : ११ ऑगस्ट, २०२३.

<u>वाचा</u> :- १) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक-कुनिवे-१०८८/९३/सेवा-४. दि. १०/०४/१९८९.

२) गृह विभाग शासन निर्णय क्रमांक-पीडब्ल्यूएफ-१००८/प्र.क्र.८/पोल-७, दि. २९/११/२००८.

३) गृह विभाग शासन निर्णय क्रमांक- पीडब्ल्यूएफ-१२११/प्र.क्र.६२९/पोल-७. दि. १३/०८/२०१३.

४) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक-सेनिवे-२०१४/प्र.क्र. १०६/सेवा-४. दि. ७/०२/२०१८.

**प्रस्तावना :-**

नक्षलवादी कारवाईसह अतिरेकी कारवाई, दरोडेखोरी, संघटीत गुन्हेगारी विरोधी कारवाई व आपात्कालीन काळात मदत करताना मृत व जखमी झालेल्या पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटुंबियांना मृत व्यक्तीला त्याच्या मृत्यूच्यावेळी देय असलेले अंतिम वेतन व इतर लाभ संदर्भाधीन शासन निर्णयान्वये त्या मृत व्यक्तीच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त होईपर्यंत देण्याबाबत तरतूद करण्यात आली आहे. शहीदांच्या पत्नीने पुनर्विवाह केल्यास तिला देण्यात येणारे वेतन बंद करण्यात आले असून, अशा प्रकरणी दिवंगत अधिकारी/कर्मचारी यांच्या विधवा पत्नी शासनाकडे अर्ज/विनंती करुन वेतन पुन्हा सुरु करण्याची मागणी करत आहेत. त्याअनुषंगाने दिवंगत अधिकारी/कर्मचारी यांच्या विधवा पत्नीने पुनर्विवाह केला तरी त्यांस संदर्भाधीन शासन निर्णयान्वये देण्यात येणारे लाभ/वेतन अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नक्षलवादी कारवाईसह अतिरेकी कारवाई, दरोडेखोरी, संघटीत गुन्हेगारी विरोधी कारवाई व आपात्कालीन काळात मदत करताना मृत व जखमी झालेल्या पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या विधवा पत्नीने पुनर्विवाह केला आहे, अशा विधवा पत्नीस कुटुंबीय या नात्याने दिवंगत अधिकारी/कर्मचारी यांच्या नियत सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत वेतन अनुज्ञेय करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर दिवंगत पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या पुनर्विवाह केलेल्या विधवांना संदर्भाधीन दि. १३/०८/२०१३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदींप्रमाणे संपूर्ण वेतनाचा लाभ अदा करण्यात यावा. तसेच, अशा दिवंगत जवानांच्या उत्पन्नावर सर्वस्वी अवलंबून असणा-या दिवंगत जवानांच्या वयोवृद्ध आई-वडील, अविवाहीत/दिव्यांग बहीण/भाऊ व अज्ञान पाल्य इ. यांच्या पालन पोषणाची जबाबदारी त्यांना घ्यावी लागेल. तसे हमीपत्र संबंधित घटक प्रमुखांनी संबंधित विधवांकडून घ्यावे. दिवंगत जवानांच्या उत्पन्नावर सर्वस्वी अवलंबून असणा-या व्यक्तींचे पालन-पोषण करण्यात येत नसेल तर संपूर्ण वेतनाचा लाभ बंद करण्यात यावा. याबाबत प्राप्त झालेल्या तक्रारीच्या अनुषंगाने निराकारण झाल्यास पुढील संपूर्ण वेतनाचे प्रदान पुनश्च सुरु करण्यात यावे. तसेच, दिवंगत पोलीस अधिकारी/कर्मचा-याच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकानंतर वित्त विभागाच्या प्रचलित शासन निर्णय/अधिसूचनांच्या अनुसार त्यांच्या कुटुंबनिवृत्तीवेतनाबाबत कार्यवाही करण्यात यावी.

३. तसेच, सदर शासन निर्णय संदर्भाकीत शासन निर्णयातील तरतुदीनुसार त्या-त्या शासन निर्णयातील दिनांकापासुन लागु राहिल. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १९८/२३/सेवा-३, दि. २६/०७/२०२३ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या अधिकृत संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२३०८१११८३१३०३६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: CN = NARAYAN BIRA MANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = ï¿¿HOME DEPARTMENT
Date: 2023.08.11 18:41:38 +05'30'

**( नारायण माने )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. अपर पोलीस महासंचालक, गन्हा अन्वेषण विभाग (गुन्हे), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. आयुक्त, गुन्हे अन्वेषण विभाग (गुप्तवार्ता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. संचालक, पोलीस बिनतारी संदेश, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. विशेष पोलीस महानिरीक्षक (नक्षलवादी प्रतिबंधक कारवाया), महाराष्ट्र राज्य, नागपूर
८. विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. प्राचार्य, पोलीस अकादमी, नाशिक व सर्व पोलीस प्रशिक्षण केंद्र, महाराष्ट्र राज्य.
१०. सर्व पोलीस आयुक्त
११. सर्व पोलीस उप महानिरीक्षक (सर्व परिक्षेत्र, रेल्वे, रा. रा. पो. बल, नागरी हक्क संरक्षण इ.)
१२. सर्व पोलीस अधिक्षक, (जिल्हा, रेल्वे, मोटार परिवहन विभाग, पुणे)
१३. सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल
१४. सर्व प्राचार्य, प्रादेशिक पोलीस प्रशिक्षण शाळा
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९.वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई
२०. सर्व मंत्रालयीन विभाग
२१. गृह विभाग (कार्यासन पोल-१ ते १५ व विशा-१अ/१ब ते विशा-८, बीयुडी - १)
२२. निवड नस्ती, पोल-७.